**यशवंतराव चव्हाण द्रुतगती मार्गावरील**
**अपघात कमी करण्यासाठी राबविण्यात**
**यावयाच्या दृष्टीने अंमलात आलेल्या**
**सामंजस्य कराराच्या अंमलबजावणीकरीता**
**समन्वय अधिकाऱ्यांची नेमणूक करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरए-०७१८/प्र.क्र.८७/पोल-८**
दुसरा मजला, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ जुलै, २०१८

**: शासन निर्णय :**

यशवंतराव चव्हाण द्रुतगती मार्गावरील अपघातांना आळा घालण्याकरीता अपघातांची शास्त्रशुध्द माहिती जमा करुन, तिचे विश्लेषण करुन अपघातांची संख्या कमी होण्याच्या दृष्टीने आवश्यक ती उपाययोजना करणे / सूचविणे व त्याची अंमलबजावणी करणे याकरीता गृह विभाग, महाराष्ट्र शासन आणि सेव्ह लाईफ फाऊंडेशन, नवी दिल्ली (अशासकीय संस्था) यांच्यामध्ये दिनांक २८ जून, २०१८ रोजी सामंजस्य करार झालेला आहे. सामंजस्य करारातील कलम १.२ मध्ये तरतूद केल्यानुसार प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता समन्वय अधिकारी नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यास अनुसरुन शासन आता खालीलप्रमाणे समन्वय अधिकारी (Nodal Officer) म्हणून नेमणूक करीत आहे :-

पोलीस अधिक्षक (मुख्यालय),
अपर पोलीस महासंचालक (वाहतूक),
महामार्ग पोलीस मुख्यालय यांचे कार्यालय,
डी.डी.बिल्डिंग, जुने जकात कार्यालय,
शहीद भगतसिंह मार्ग, मुंबई
दूरध्वनी : ०२२/२२६७०३१३, २२६१५७५७

समन्वय अधिकारी यांचेवर महाराष्ट्र शासन आणि सेव्ह लाईफ फाऊंडेशन यांचेदरम्यान झालेल्या उक्त सामंजस्य कराराअंतर्गत, कामकाजासंदर्भात योग्य ते समन्वय राखण्याची जबाबदारी राहील.

प्रस्तुतचा शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०७२७१५४६५७७३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sudhakar D. Pawar
Digitally signed by Sudhakar D. Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c1ebd27661971090dc2c91d4bb9caabd4da394aa85829a09265097faf097ba5, cn=Sudhakar D. Pawar
Date: 2018.07.27 15:47:14 +05'30'

**( सु. धों. पवार )**
**अवर सचिव, गृह विभाग**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री यांचे सचिवालय, मंत्रालय

२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग
३. प्रधान सचिव, परिवहन विभाग
४. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग
५. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग
६. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग
७. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ
९. पोलीस अधिक्षक (मुख्यालय), महामार्ग पोलीस तथा समन्वय अधिकारी
१०. मुख्य संचालन अधिकारी, बिव्हीजी १०८ रुग्णवाहिका सेवा
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, सेव्ह लाईफ फाऊंडेशन, नवी दिल्ली
१२. निवड नस्ती (पोल-८).